आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, मुंबई कार्यालयातील सह आयुक्त (मळी / मद्यार्क) हे पद पुन:स्थापित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. इएसटी-१७२२/प्र.क्र.१०२/राउशु-१**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २२ जून, २०२३.

संदर्भ :- १) शासन निर्णय, गृह विभाग, क्र.इएसटी-१६१६/प्र.क्र.२००/राउशु-१, दि.०२.०९.२०२१.
२) शासन निर्णय, गृह विभाग, क्र.बीजीटी-१०२१/प्र.क्र.९६/राउशु-१, दि.०५.०१.२०२२.
३) शासन निर्णय, क्र.इएसटी-१७२२/प्र.क्र.१०२/राउशु-१,दि.२२.०४.२२

**प्रस्तावना:-**

मा.मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय समितीने दि.०३.०८.२०१९ च्या बैठकीमध्ये दिलेल्या मान्यतेनुसार, संदर्भ क्र.१ वरील शासन निर्णय दि.०२.०९.२०२१ अन्वये राज्य उत्पादन शुल्क विभागाचा विविध ३१ संवर्गात ३८०० पदांचा सुधारित आकृतीबंध निश्चित करण्यात आला आहे. तद्नंतर, संदर्भ क्र.२ वरील शासन निर्णय, दि.०५.०१.२०२२ अन्वये राज्य उत्पादन शुल्क विभागातील नागपूर व औरंगाबाद या प्रादेशिक विभागांचे विभाजन करुन अनुक्रमे अमरावती व नांदेड हे दोन नवीन प्रादेशिक विभाग निर्माण करण्यात आले असून, या विभागांसाठी प्रत्येकी १९ प्रमाणे ३८ नियमित पदे व बाह्ययंत्रणेद्वारे प्रत्येकी २ प्रमाणे ४ पदे अशी एकूण ४२ नवी पदे निर्माण करण्यात आली आहेत. संदर्भाधीन क्र.३ च्या आदेशान्वये सह आयुक्त (समन्वय) हे पद नागपूर येथे कार्यान्वीत करण्यात आले होते. त्यानुसार सद्य:स्थितीत नवीन आकृतीबंधानुसार सहआयुक्त दर्जाची २ पदे मंजुर आहेत त्यापैकी सहआयुक्त (प्रशासन) हे पद मुंबई मुख्यालयी व नागपूर येथे सह आयुक्त (समन्वय) अशी २ पदे कार्यरत आहेत.

राज्य उत्पादन शुल्क विभागाच्या आयुक्तालयातील कामकाजाचे स्वरूप व सहआयुक्त (प्रशासन) यांना प्रस्तावीत कामांमुळे त्यांचेकडील मळी-मद्यार्क या महत्वपूर्ण विषयाच्या कामकाजास उचित न्याय मिळण्यास कमी वेळ मिळत आहे. सदर बाब विचारात घेता विभागाच्या महसूलाचा महत्वपूर्ण स्त्रोत असणा-या या विषयासाठी पूर्वीप्रमाणेच राज्य उत्पादन शुल्क आयुक्तालयात सह आयुक्त दर्जाचा स्वतंत्र अधिकारी असावा असे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय-**

उपरोक्त संदर्भाधीन क्र.३ च्या दि.२२.०४.२०२२ च्या शासन निर्णयान्वये नागपूर येथे स्थलांतरीत केलेले सह आयुक्त(समन्वय) या पदाची पुन्हा राज्य उत्पादन शुल्क विभागाच्या आयुक्त कार्यालय,मुंबई येथे पुन:स्थापना करून त्याचे नाव पूर्वीप्रमाणेच सह आयुक्त (मळी/मद्यार्क) करण्यात येत आहे.

२. सह आयुक्त (मळी/मद्यार्क) या पदाचे वेतन व भत्ते राज्य उत्पादन शुल्क आयुक्तालयातील अधिकारी/ कर्मचारी यांचे वेतन व भत्ते ज्या लेखाशिर्षाखाली आहारीत करण्यात येतात त्या लेखाशिर्षाखाली आहारीत करण्यात यावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०२३०६२२१६४६०४४०२९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANDEEP GORAKHNATH DHAKANE

Digitally signed by SANDEEP GORAKHNATH DHAKANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=418588839686584ca25060bf57af23a4473234ebcc421d084d8890fc37c8f673, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E7B44D71EACB46FA051532FB66A73DA715F678033161C1162FA83F6713D03552, cn=SANDEEP GORAKHNATH DHAKANE
Date: 2023.06.22 16:47:31 +05'30'

**( संदिप ढाकणे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.मंत्री (राज्य उत्पादन शुल्क) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/ विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५. अप्पर मुख्य सचिव (राउशु) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
६. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
७. आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
१०.श्री.विश्वनाथ गं. इंदिसे, सह आयुक्त (समन्वय), नागपूर (आयुक्त, राउशु यांचेमार्फत)
११.विभागीय उप आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, नागपूर विभाग, नागपूर
१२.अवर सचिव/ कक्ष अधिकारी (राउशु-२/राउशु-३), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
१३.निवडनस्ती (राउशु-१).